**महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई खंडपीठ नागपूर व पुणे येथील दोन सदस्यांच्या अस्थायी पदांना दि.०१/१०/२०१८ ते २८/०२/२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्र. राजस २०१८/ प्र.क्र.९१ / ५ स,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :-१९ सप्टेंबर, २०१८

**वाचा :-** १) शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग क्र.राजस-१००८/ प्र.क्र.५३८/ ५-स, दि. ५.५.२०११
२) शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग क्र.राजस २०१८/ प्र.क्र.९१/५-स दि.२२/०३/२०१८
३) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था,पुणे यांचे पत्र क्र.आस्थापना/कक्ष-४/सह.न्याया./ /अस्थायी पदे/मुदतवाढ/९१५/२०१८, दि.२६/०७/२०१८
४) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई यांचे पत्र जा.क्र. मरासअन्यामुं/आस्था/ अ.प.मु.वा./२३३/२०१८,दि.१३/०२/२०१८
५) वित्त विभाग,शासन निर्णय क्र.पदनि२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि०७/०९/२०१८

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई खंडपीठ नागपूर व पुणे येथील दोन सदस्यांच्या अस्थायी पदांना दि.३०/०९/२०१८ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास संदर्भाधिन क्र.२ येथील दि.२२/०३/२०१८ च्या शासन निर्णयांन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. प्रशासकीय कारणास्तव सदरची अस्थायी पदे पुढे चालू ठेवणे आवश्यक असून त्यांना सन २०१८-२०१९ करिता मुदतवाढ मिळणे आवश्यक आहे. सबब, शासन निर्णय दि.५/५/२०११ अन्वये निश्चित केलेल्या आकृतिबंधात उक्त पदांचा समावेश आहे, या अटीच्या अधीन राहून महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई खंडपीठ नागपूर व पुणे येथील दोन सदस्यांच्या अस्थायी पदांना दि.०१/१०/२०१८ ते २८/०२/२०१९ पर्यत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देत आहे.

२. याकरिता होणारा खर्च "मागणी क्र.व्ही-२, ०१ - सहकार, ००१- संचालन व प्रशासन,(०१) संचालन व प्रशासन (०१)(०९) महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय (२४२५०१०२)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखालील सन २०१८-२०१९ च्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय, दि.०७/०९/२०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९१९१११५०३५१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Manjiri Ganeshbhushan Joshi

Digitally signed by Manjiri Ganeshbhushan Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=91b4708db2a52d675f7f30d81444f3844833dfc7c86d4244ee1075c97c713180, serialNumber=7d5731d128ab41d6a090557a2e9658b7382ac03af6e239ba66cc1cf9a6cf2f52, cn=Manjiri Ganeshbhushan Joshi
Date: 2018.09.19 11:19:00 +05'30'

**( मं.ग.जोशी )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन,
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई,
३. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन), पुणे, नागपूर
४. सदस्य, महाराष्ट्र सहकारी अपील न्यायालय, खंडपीठ, नागपूर/पुणे, द्वारा प्रबंधक, महाराष्ट्र राज्य
५. सहकारी अपील न्यायालय, मुंबई
६. महालेखापाल-१, महाराष्ट्र, मुंबई (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),
७. महालेखापाल-२, महाराष्ट्र नागपूर (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/पुणे,
९. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-१२,
१०. कक्ष अधिकारी, कार्यासन १७-स, १५-स,सहकार व वस्त्रोद्योग विभाग,
११. निवड नस्ती.